राष्ट्रीय सामाजिक सहाय्य कार्यक्रमातंर्गत विशेष सहाय्य योजनांचे सामाजिक अंकेक्षणाकरीता अग्रीम खर्चास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक: विसयो-२०२२/प्र.क्र. ९४/विसयो**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४.

**वाचा :-** १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक विसयो २०१८/प्र.क्र.६२/विसयो, दिनांक २०.०८.२०१९,
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक विसयो २०२२/प्र.क्र.१२०/विसयो, दिनांक ०५.०७.२०२३.
३) केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. J-१६०१९/०१/२०१७-NSAP (३५४२३५), दिनांक १५.०९.२०२२.
४) संचालक, महाराष्ट्र राज्य सामाजिक अंकेक्षण व पारदर्शकता सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्र. नयोप्र-३८२३/प्र.क्र.११/साअंसो, दिनांक २४.०७.२०२३ व २९.०८.२०२३

**प्रस्तावना** :-

राष्ट्रीय सामाजिक सहाय्य कार्यक्रमातंर्गत केंद्र पुरस्कृत इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्तीवेतन योजना व राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना तसेच राज्य पुरस्कृत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्ती वेतन योजना या योजना राज्यात राबविण्यात येतात. केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांचे सामाजिक अंकेक्षण करण्याचे निर्देश संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये दिलेले आहेत. केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत या योजना एकमेकींना पूरक आहेत. संचालक, महाराष्ट्र राज्य सामाजिक अंकेक्षण व पारदर्शकता सोसायटी, मुंबई यांच्या संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये विशेष सहाय्य योजनांचे ६० ग्रामपंचायत क्षेत्रात करावयाच्या एका अंकेक्षणासाठी रु. ८,२४,४००/- इतका खर्च येणार आहे. सुरुवातीला आवश्यक असलेल्या निधीपैकी ४० टक्के म्हणजेच रु. ३,२९,७६०/- इतका निधी अग्रीम देण्याची मागणी केली आहे. त्यानुसार सदरहू योजनांचे प्रत्येक महसूल विभागात प्रत्येकी २ जिल्ह्यातील २ तालुक्यांचे असे राज्यात एकूण १२ तालुक्यांचे (प्रत्येक तालुक्यात ६० ग्रामपंचायतीत) सामाजिक अंकेक्षण करण्याचा निर्णय घेण्यात आला असून सदर सामाजिक अंकेक्षणाकरीता अग्रीमास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्तीवेतन योजना व राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना तसेच

राज्य पुरस्कृत संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्ती वेतन योजना या योजनांचे प्रत्येक महसूल विभागात प्रत्येकी २ जिल्ह्यातील २ तालुक्यांचे असे राज्यात एकूण १२ तालुक्यांचे प्रत्येक तालुक्यात ६० ग्रामपंचायतीत करावयाच्या सामाजिक अंकक्षेणासाठी रु.३९,५७,१२०/- (रु.एकोणचाळीस लक्ष सत्तावन हजार एकशे वीस फक्त) इतक्या अग्रीम खर्चास तपशिलवार देयके व उपयोगिता प्रमाणपत्र विभागास सादर करण्याच्या अटींच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य सामाजिक अंकेक्षण व पारदर्शकता सोसायटी, मुंबई यांना देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सामाजिक अंकेक्षण करावयाच्या जिल्हा व तालुक्यांची यादी पुढीलप्रमाणे:-

| अ.क्र. | महसूल विभाग | जिल्हा | सामाजिक अंकेक्षण करावयाचा तालुका |
|---|---|---|---|
| १ | कोकण | ठाणे | भिवंडी |
| | | रायगड | महाड |
| २ | नाशिक | नाशिक | मालेगाव (शहर) |
| | | अहमदनगर | कोपरगाव |
| ३ | पुणे | पुणे | बारामती |
| | | कोल्हापूर | कागल |
| ४ | नागपूर | नागपूर | कामठी |
| | | भंडारा | तुमसर |
| ५ | अमरावती | अमरावती | अचलपूर |
| | | अकोला | अकोट |
| ६ | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर | सिल्लोड |
| | | बीड | केज |

२. सदरची रक्कम ही संचालक, महाराष्ट्र राज्य सामाजिक अंकेक्षण व पारदर्शकता सोसायटी, मुंबई यांच्या बँक ऑफ इंडिया, चर्चगेट शाखा खाते क्रमांक ००१०१०११०००८६४८, आयएफएससी कोड BKID००००१० या खात्यावर पाठवावी.

३. या खर्चासाठी श्री.अ.कों.अहिरे, अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत असून श्री.सो.ना. बागुल, सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा खर्च मागणी क्रमांक "एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८) (०६) इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना व राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना अंमलबजावणीसाठी प्रशासकीय खर्च (केंद्र पुरस्कृत योजना) (२२३५ ३०१४) ५०-इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परीपत्रक क्रमांक अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३३०१६५७०७१५२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.30 17:07:28 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२ प्रती),
४. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
५. संचालक, महाराष्ट्र राज्य, सामाजिक अंकेक्षण व पारदर्शकता सोसायटी, मुंबई,
६. वित्त विभाग व्यय-१४ / अर्थ-७, मंत्रालय, मुंबई,
७. निवड नस्ती (विसयो).